71\D:\TRA-5- mct 0403-723.bwp

**पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण व जिल्हा व सत्र न्यायाधिश, सिंधुदुर्ग यांना कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक : एमसीटी-०५०३/७६५/सीआर-८१/परि-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : 27 जून, २००३

<u>वाचा :-</u> १) शासन अधिसूचना, गृह विभाग क्र.एमसीटी-१०९७/सीआर-६०/परि-७, दि.१७.१२.१९९७
२) जिल्हा व सत्र न्यायाधिश, सिंधुदुर्ग यांचे पत्र क्र. वित्त ९०५/२००३, दि.१७.३.२००३
३) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) यांचे पत्र क्र.ए/१२२४/८०, दिनांक २९.४.२००३

**शासन निर्णय :-** मोटार वाहन कायदा, १९८८ (१९८८ चा ५९) च्या कलम १६५ (२) च्या अधिकारानुसार शासन अधिसूचना, गृह विभाग क्र.एमसीटी-१०९७/सीआर-६०/परि-७, दि.१७.१२.१९९७ अन्वये सिंधुदुर्ग येथे मोटार अपघाताचे दावे चालविण्यासाठी एक सदस्यीय मोटार अपघात दावा न्यायाधिकरण स्थापण्यात आले आहे व जिल्हा व सत्र न्यायाधीश, सिंधुदुर्ग यांची या न्यायाधिकरणावर पदसिध्द सदस्य म्हणून नेमणूक केली आहे. आता या आदेशान्वये पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, सिंधुदुर्ग यांना या न्यायाधिकरणाचे कार्यालय प्रमुख, तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११.७.२००१ मधील अ.क्र.३ वरील नियम क्रमांक.२ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

विजय बागवे
**(विजय बागवे)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्रान्वये)
जिल्हा व सत्र न्यायाधिश, सिंधुदुर्ग,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
विधी व न्याय विभाग, कार्यासन-१२/कार्यासन-३, मंत्रालय, मुंबई-३२,
वित्त विभाग, (विनियम/ कार्य ८) मंत्रालय,मुंबई-३२,
निवडनस्ती, परिवहन-५.